**कोषागारात रोख देय अनुदान**

**महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियान कार्यक्रमाची अंमलबजावणी, प्रचार, प्रसिध्दी व बक्षीस योजना याकरिता उपलब्ध निधी मुक्त करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

***पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग***

**शासन निर्णय क्रमांक : लेखानु२००९/प्र.क्र. २७० /पापु२१**

***मंत्रालय, मुंबई ४०० ०३२***

**दिनांक :७ ,जानेवारी २०१०**

**पहावे :-** (१) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.नास्वअ२००७/प्र.क्र.६४/पापु२१दि.२६/१०/२००७
(२) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.लेखानु२००९/प्र.क्र.९४/पापु२१ दि.२८/४/२००९
(३) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.लेखानु२००९/प्र.क्र.९४/पापु२१ दि.८/५/२००९
(४) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.लेखानु२००९/प्र.क्र.९४/पापु२१ दि.२/६/२००९
(५) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.लेखानु२००९/प्र.क्र.९४/पापु२१ दि.२/७/२००९
(६) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.लेखानु२००९/प्र.क्र.२००/पापु२१ दि.२५/८/२००९
(७) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.लेखानु२००९/प्र.क्र.२००/पापु२१ दि.२५/९/२००९
(८) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.लेखानु२००९/प्र.क्र.२००/पापु२१ दि.३०/१०/२००९
(९) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.लेखानु२००९/प्र.क्र.२००/पापु२१ दि.२४/११/२००९
(१०) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.लेखानु२००९/प्र.क्र.२००/पापु२१ दि.१८/१२/२००९

**शासन निर्णय :-**

सन २००९-१० या वर्षाच्या अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये **“ मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ - जलनि:स्सारण व स्वच्छता,१०५, स्वच्छता व सेवा, (०२) (०१) संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी, प्रचार, प्रसिध्दी व बक्षीस योजना, (योजनेतर) (२२१५-२३११) २६, जाहिरात व प्रसिध्दी ”** या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या रु.६५०.०० लक्ष तरतूदीपैकी वित्त विभागाने मान्य केलेल्या मासिक निधी विवरणानुसार माहे डिसेंबर, २००९ ते मार्च, २००९ या कालावधीकरिता एकूण रु.४३८,४३ लक्ष निधी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला असून माहे जानेवारी,२०१० करिता उपलब्ध करण्यात आलेला रु. ५०.०० लक्ष (रुपये पन्नास लाख फक्त) निधी सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई यांना उक्त बाबीकरिता खालील अटींवर कोषागारातून रोख देय स्वरुपात मुक्त करण्यात येत आहेत :-

अ) वरील मंजूर रक्कमेच्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

ब) या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला निधी ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनार्थ खर्च करण्यात यावा.

क) वरील मंजूर निधीतून होणा-या खर्चाबाबत प्रत्येक महिन्याची माहिती पुढील महिन्याच्या “५” तारखेपर्यंत प्राधिकरणाने शासनाला कळवावी.

ड) हा निधी शासन आदेश देईल तेव्हा महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने, डिमांड ड्राफ्टद्वारे / धनादेशाद्वारे शासनाच्या आदेशानुसार मुक्त करावा व त्या आदेशाची प्रत शासनाकडे पाठवावी.

इ) या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे प्राधिकरणाने द्यावयाची आहेत. त्यात दर्शविलेल्या मंजूर निधीच्या व खर्चाच्या रक्कमा प्राधिकरणाच्या वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी यांनी प्रमाणित करुन स्वाक्षरीत कराव्यात व त्या प्रमाणपत्रावर प्राधिकरणाचे सदस्य सचिवांनी त्या प्रतिस्वाक्षरीत कराव्यात, म्हणजे अशी प्रमाणपत्रे या विभागात स्विकारार्ह होतील. या उपयोगिता प्रमाणपत्राच्या प्रती अधिदान व लेखाधिकारी कार्यालयालाही पाठवाव्यात.

२. वर मुक्त करण्यात आलेला निधी मिळविण्यासाठी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे सदस्य सचिव किंवा प्राधिकरणाचे वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी (श्री. प्र. वा. पांढरीपांडे) यांच्या सहीने तयार केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. सदर रक्कमेचा धनादेश महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे नावे देण्यात यावा.

३. हा होणारा खर्च "मागणी क्रमांक वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ - जलनि:स्सारण व स्वच्छता,१०५, स्वच्छता व सेवा, (०२) (०१) संत गाडगेबाबा नागरी स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी, प्रचार,प्रसिध्दी व बक्षीस योजना, (योजनेतर) (२२१५-२३११) २६, जाहिरात व प्रसिध्दी" या योजनेतर कार्यक्रमासाठी निधी या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व त्याखालील सन २००९-१० या अर्थिक वर्षातील उपलब्ध तरतुदीतून भागवावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाने प्रशासकीय विभागांना मासिक निधी वितरणाबाबत प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे. सदर निधी मासिक निधी विवरणपत्रानुसारच आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००१०७१५२४१५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्रितमकुमार जावळे)
कक्ष अधिकरी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई-४०० ०२१
२. वित्तीय सल्लागार व मुख्य लेखाधिकारी,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,सिडको भवन,बेलापूर,नवी मुंबई.
३. संचालक, नगरपालिका प्रशासन, वरळी, मुंबई
४. विभागीय आयुक्त (सर्व)
५. जिल्हाधिकारी (सर्व)
६. महानगरपालिका आयुक्त (सर्व)
७. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखाधिकारी,मुंबई.
११. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. मुख्याधिकारी / अध्यक्ष , नगर परिषदा (सर्व)
१३. वित्त विभाग(व्यय३/अर्थसंकल्प१९), मंत्रालय, मुंबई
१४. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधान भवन, मुंबई
१६. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र.पापु-०४ व २०.

१७. निवड नस्ती, कार्यासन .क्र.पापु-२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१८. संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग